!! संतस्तुत गणराज !!

भगवान श्री गणेश हे सर्वपूज्य, सर्वादिपुज्य दैवत. कोणत्याही मंगलकार्यास आरंभ होणार तो श्री मंगलमूर्तीच्या मंगलमय पूजनाने, वंदनाने किमान स्मरणाने भारतीय संस्कृतीचा हा अलिखीत दंडकच. सगळ्या सामान्यांनीच नव्हे तर महापुरुषांनीही ही मर्यादा सातत्याने पाळली आहे.
महाराष्ट्र ही संतांची भूमी आहे. संतसाहित्याने येथील जनमानसाला अखंड प्रफुल्लीत केले आहे. या सगळ्याच संतांनी आपल्याला ग्रंथांच्या आरंभी केलेली श्रीगणेशवंदना हा एक वेगळाच आनंद विषय आहे. अध्ययनाचा, चिंतनाचा, अनुकरणाचा, आस्वादाचा विषय आहे.

विविध संतांनी केलेल्या गणेशवंदनेचा रसास्वाद घेण्यापूर्वी काही गोष्टी समानतेने पाहता येतील ही समानताच एका वेगळ्या आनंदाचा भाग आहे.

प्रथम महत्वाचा भाग म्हणजे यातील कोणत्याच प्रधान संतांनी तुमच्या माझ्या डोळ्यात परंपरेने रूढ झालेल्या मोरयाच्या रुपाला स्पर्श केलेला नाही. जनमानसात मोरयाची रूढ प्रतिमा म्हणजे पार्वतीपुत्र, शिवनंदन, शिवगणप्रमुख, शंकर वरदान प्रभावाने युक्त देवता. मात्र यातील एकही कथन यथार्थ नाही. प्रसंगोपात्त रीतीने या बाबी त्यांच्या अवतारलीलांचा भाग असला तरी ते वास्तव नाही. ते मोरयाचे स्वरूप नाही. याच कारणाने कोणत्याही संतांनी श्रीगणेशांच्या या शिवपुत्रत्वाचा, पार्वतीनंदनत्वाचा विचार आधारभूत मानलेलाच नाही.

पण मग प्रश्न येतो की जे मोरयाचे स्वरूप इतके मर्यादित नसेल तर ते नेमके आहे तरी कसे? तर गाणपत्य संप्रदायाच्या परमशास्त्रीय भूमिकेनुसार श्रीगणेशांचे स्वरूप आहे ओकाररुपत्व, परब्रह्म परमात्म स्वरूप. निर्गुण निराकार सच्चिदानंद परब्रह्म रुपात श्रुतीस्मृतींनी वंदिलेले परमतत्व आहे श्रीगणेश.

सगळ्याच संतांनी याच परब्रह्म परमात्म रूपाचेच वर्णन केले आहे. त्या स्वरूपाचीच आळवणी केली आहे. कारण हे ऑकर रूप परब्रह्मच भारतीय संस्कृतीचे आराध्य तत्व आहे. अन्य सर्व ईश्वर महेश्वरही याच ऑकाराचे अंशरुप आहेत. मात्र परिपूर्ण ऑकार ब्रह्माचे एकात्म वंदन करायचे तर ते श्रीगणेश रुपातच संभव आहे ही सगळ्या संतांची भूमिका आहे. याच कारणाने संतमांदियाळीचे मेरुमणी माऊली ज्ञानेश्वर महाराज सुस्पस्ट शब्दात घोषणा करतात की "देवा तूची गणेशु!"
मंगलाचरण हे या परममंगलाचे आहे. या अनंतकोटीब्रह्मांडनायक परम 'कारणाचे' आहे शिवपार्वती नंदन रूप 'कार्याचे' नाही.

अन्यच मंगलाचरणाचे एक प्रयोजन असते अविघ्नता सिद्धी. कार्यात कोणतेही विघ्न येऊ नये म्हणून विघ्नविनायकाचे वंदन केले जाते. मात्र संतकृतस्तवने अशी नाहीत. कारण अशा स्तवनात प्रीतीपेक्षा भीतीच जास्त असते आणि संतांच्याठायी भीतीचा संबंधच असू शकत नाही. संत अभयाचे स्वरूप हीच वास्तविकता असते. अत: हे मंगलाचरण अविघ्ननाशार्थ नाही तर परब्रह्मवंदन रूपच असते.
हे केवळ शिवपुत्र वंदन नाही म्हणण्याचे एक वेगळ कारण असे की कधीकाळी आपल्या देशात शैव आणि वैष्णव वाद पराकोटीचा तीव्र होता. संत वादाचे नाही तर संवादाचे जनक असतात हे जरी खरे असले तरी श्रीगणेश केवळ शिवपुत्र असते तर वैष्णव, शाक्त, सौर इ. अन्य मार्गीयांनी त्यांच्या आरंभ वंदनात मुद्दाम रस घेतला नसता. मात्र संतसाहित्यात आपणास श्रीगणेशांच्या आरंभ वंदना बाबत सार्वत्रिक एकमत पहावयास मिळते.

बरे हे केवळ आरंभवंदन आहे इतकेच नाही. ज्यावेळी आपण एकेका संतांनी केलेल्या गणेशवंदनेस सविस्तर रीत्या पाहू त्यावेळी आपणास अशा काही अदभुत रचना मिळतील की ज्या आपणास थक्क करतील.

विशेषत: संतशिरोमणी नामदेव महाराज यदुमाणिक, मध्वमुनीश्वर किंवा सरस्वती गंगाधरांच्या रचना पाहिल्या की आपणास मोरयाचे एक आगळंच वैभव ध्यानात येईल.

ही चारही विभूतीमत्वे रुदार्थाने गाणपत्य संप्रदायाची व गणेशोपासक नाहीत. सामान्य विचार करता

श्रीनामदेव महाराज वारकरी, यदुमाणिक नाथसंप्रदायी मध्वमुनीश्वर वैष्णवपंती तर सरस्वती गंगाधर दत्त संप्रदायाचे. मात्र या चारही संतांची अशी कवन रचना उपलब्ध आहे की ज्यामध्ये त्यांनी आपल्याला आराध्य दैवताला श्रीगणेशोपासना रात रुपात वर्णिले आहे.
सामान्यत: कोणत्याही साधकास, उपासकास त्याची उपास्य देवताच सर्वोच्चस्थानी असते. तशी ती असावीही. मात्र त्या आपल्या उपास्याने केलेली श्रीगणराज प्रभूंची उपासना, त्या त्या देवतांच्या भक्तांनी वर्णन करणे हे असामान्य आहे. मात्र ते असे करतात कारण ते ख-या अर्थाने यथार्थवक्ता आहेत. सत्यवादी आहेत आणि सत्यता हीच आहे की मोरयाच या विश्वाचे अंतिम तत्व आहे तोच ओंकाररूप परब्रह्म आहे.

संतांनी या ओंकाररूप सकाळ कारणाला वंदन केले आहे.
अकार चरण युगुल! उकार उदर विशाल
मकारू महामंडल! मस्तकाकारे!
ही प. पु. माउलींची कथनी असो की
ओंकार प्रधान रूप गणेशाचे
जे तिन्ही देवांचे जन्मस्थान

हा जगदगुरु तुकोबारायांचा उदघोष असो. सर्वच श्रीगणराज प्रभूंच्या ओंकार रुपत्वाचाच विचार आधारस्थानी आहे.
तुम्ही म्हणाल मग शिवपार्वतीनंदन रूपाचे काय? तर श्रीसमर्थ रामदास स्वामी सुस्पस्ट कथन करतात.

जयावरी लटीकाची आळ आला
जो माया गौरी पासोनी जाहला
झालाची नाही त्या अरुपाला
रुप कैसे?

विविध संतांनी केलेल्या अशा गणेशवंदनेला यथार्थरीत्या अभ्यासण्याचे कार्यच येथून पुढच्या लेखांमधून करूयात.

!! जय गणेश !!